महाराष्ट्र ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड
टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळ.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीआर-०७१९/प्र.क्र.१७०/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यात अनेक वर्षांपासून ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालकांसाठी स्वतंत्र कल्याणकारी मंडळ परिवहन विभागांतर्गत स्थापन करण्याबाबत मागणी करण्यात येत होती. महाराष्ट्रातील ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी यांची नोंदणी, बॅज वितरण, निरीक्षण, तपासणी व कर भरणा परिवहन खात्यामार्फत करण्यात येतो. त्यामुळे ऑटो-रिक्षा आणि मीटर्ड टॅक्सी चालकांची अद्ययावत संपूर्ण माहिती (डेटा) परिवहन विभागाकडे उपलब्ध असते. त्यामुळे, परिवहन विभागातंर्गत ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळ स्थापन करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

महाराष्ट्र ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळाची स्थापना करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर मंडळाचे मुख्यालय मुंबई येथे असेल.

२. महाराष्ट्र ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळाची रचना पुढीप्रमाणे असेल:-

**राज्यस्तरीय कल्याणकारी मंडळ :-**

| | |
|---|---|
| मा. मंत्री (परिवहन) | अध्यक्ष |
| परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| नोंदणीकृत ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक यांच्या संघटनेचे प्रतिनिधी (२ सदस्य) | अशासकीय सदस्य |
| सह/अपर परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

**जिल्हास्तरीय कल्याणकारी मंडळ :** प्रादेशिक परिवहन प्राधिकरणाच्या कार्यक्षेत्रानुसार व आवश्यकतेनुसार एक किंवा एकापेक्षा जास्त जिल्हास्तरीय कल्याणकारी मंडळ स्थापन करण्यात येतील. या जिल्हास्तरीय मंडळामध्ये पुढीलप्रमाणे सदस्य असतील-

| | |
|---|---|
| संबंधित जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| पोलीस उपायुक्त (वाहतूक)/अपर पोलीस अधीक्षक | सदस्य |
| प्रादेशिक परिवहन अधिकारी/उपप्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य |
| नोंदणीकृत ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक यांच्या संघटनेचे प्रतिनिधी | अशासकीय सदस्य |
| सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य सचिव |

३. महाराष्ट्र ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळाकडून केंद्रशासनामार्फत व राज्यशासनामार्फत राबविण्यात येणा-या पुढील विविध कल्याणकारी योजनांचा लाभ ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालकांना देण्यात येतील-

१. जीवन विमा व अपंगत्व विमा योजना

२. आरोग्य विषयक लाभ

३. कर्तव्यावर असताना दुखापत झाल्यास अर्थसहाय्य योजना (रु.५०,०००/- पर्यंत)

४. पाल्यांच्या शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजना

५. कामगार कौशल्य वृध्दी योजना -- इ.

४. महाराष्ट्र ऑटो-रिक्षा आणि मिटर्ड टॅक्सी चालक कल्याणकारी मंडळ स्वायत्त व स्वयंपूर्ण व्हावे यासाठी शासनाकडून एकवेळचे अनुदान रुपये ५०.०० कोटी (अक्षरी रक्कम रुपये पन्नास कोटी) उपलब्ध करून देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर मंडळाच्या कार्यपध्दती/कामकाजाबाबतची नियमावली स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक १६.०३.२०२४ रोजी संपन्न बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१६३२४१८०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAGAR DHONDIRAM PATIL

Digitally signed by SAGAR DHONDIRAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b303a302c4285dac740589e585048fce69e2ef2ade0799db990bcdca3ead8311, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0255578456B2F5C05285C172A57976163858393ED219ED428FAD29A0BBE29DEE, cn=SAGAR DHONDIRAM PATIL
Date: 2024.03.16 16:42:01 +05'30'

**( सागर धों. पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा.मंत्री , मंत्रालय, मुंबई.
५) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७) मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८) मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१०) मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
११) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१९) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२२) वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२३) गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.
२४) निवडनस्ती/परि-२.